**जलसंपदा विभागाअंतर्गत क्रीडा सामने व सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२३१४/(४१६/१४)/लपा-२**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

तारीख: ०८ जानेवारी, २०१५.

वाचा

1) **शासन निर्णय क्रमांकः शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई, शासन निर्णय क्र. क्रिडायो-२०११/प्र.क्र. ५५/क्रियुसे-१, दिनांक १४ जून, २०१२.**

**प्रस्तावना**

राज्यात क्रीडा संस्कृतीचे संवर्धन, प्रचार, प्रसार व जोपासना करणेसाठी पोषक वातावरण निर्माण करणेसाठी क्रीडा धोरण जाहीर करणारे, महाराष्ट्र हे देशातील पहिले राज्य आहे. या धोरणामध्ये क्रीडा विषयक पायाभूत सुविधांची निर्मिती, खेळाडूंचे प्रशिक्षण तसेच विकास या बाबींचा प्रामुख्याने समावेश आहे.

संदर्भाधीन शासन निर्णयामधील मुद्दा क्र. ४.६ , खेळाद्वारे सर्वांसाठी सुदृढता क्रिडा धोरण ( पृ.क्र. २७) नुसार राज्याच्या विकासाच्या प्रक्रियेमध्ये आरोग्यसंपन्न मनुष्यबळ प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणे परिणाम करत असते. असे उधृत करून कर्मचाऱ्यांची शारीरिक तंदुरुस्ती वा कार्यक्षमता वाढीस लागून उत्पादन वाढणेसाठी शासकीय, निमशासकीय, महामंडळ, सहकारी संस्था इ ठिकाणी कार्यरत कर्मचा-साठी विविध क्रीडा स्पर्धांचे आयोजन संबंधित विभागामार्फत करणेचे आदेश दिलेले आहेत.

जलसंपदा विभागाचे व्हिजन २०२० कार्यशाळेमध्ये सार्वजनिक बांधकाम विभाग, महसूल व वन विभाग व सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाप्रमाणे जलसंपदा विभागांतर्गत क्रिडा सामने तसेच सांस्कृतिक कार्यक्रम भरविण्यात यावे अशी आग्रही मागणी करण्यात आली होती. राज्याचे क्रिडा धोरण व सुचनांचा विचार करता जलसंपदा विभागाअंतर्गत राज्यस्तरावर व प्रादेशिक स्तरावर/महामंडळस्तरावर क्रिडा व सांस्कृतिक स्पर्धा आयोजित करण्याबद्दल शासनाचे विचाराधीन होते. त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे सुचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक**

शालेय शिक्षण व क्रिडा विभागाच्या दिनांक १४ जून, २०१२ च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने जलसंपदा विभागांतर्गत राज्यस्तरावर व प्रादेशिक स्तरावर/महामंडळ स्तरावर क्रीडा स्पर्धा आयोजीत करण्यात यावी.

क्रिडा स्पर्धा दरम्यान सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करावे. जेणे करून कर्मचा-यांच्या कला गुणांना वाव मिळेल तसेच एकात्मिक बंधुभाव वाढण्यास मदत होईल.

या स्पर्धेमध्ये सर्व अधिकारी/कर्मचारी यांचा सहभाग होण्यासाठी विभागांतर्गत व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०११२१४४६०७०८२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2015.01.12 14:56:35 +05'30'

**( डॉ. संजय बेलसरे )**

शासनाचे उपसचिव

**प्रत,**

१. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
४. महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, वाल्मी, औरंगाबाद.
५. महासंचालक, मेरी, नाशिक.
६. सर्व मुख्य अभियंता/अधिक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
७. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/ कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. लपा-२, कार्यासन संग्रहार्थ.